**याचिका क्रमांक ८२५६/२०१३ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक १३.१०.२०१४ रोजी दिलेल्या आदेशांचे अनुपालन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: न्यायाप्र-२०१७/प्र.क्र. ३१६/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २८ मार्च, २०२३.

वाचा:-१) समक्रमांकाचा दिनांक २४ एप्रिल,२०१८ चा शासन निर्णय.
२) संचालक, उच्च शिक्षण यांचे पत्र क्रमांक उशिसं/सुधसेनिपेन्शा/कोवि/विशि ३५९, दिनांक १२ जानेवारी,२०२३

**प्रस्तावना:-**

शिवाजी विद्यापीठ शिक्षक संघटना (सुटा) यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका क्रमांक ८२५६/२०१३ दाखल केली होती. त्याद्वारे "दिनांक १ जानेवारी,२००६ ते दिनांक २७ फेब्रुवारी,२००९ या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांना, २० वर्षांच्या अर्हताकारी सेवेवर, सेवानिवृत्तीच्या शेवटच्या १० महिन्यांत अर्जित केलेल्या सरासरी वेतनाच्या किंवा शेवटच्या महिन्यात घेतलेल्या वेतनाच्या ५० टक्के यापैकी जी रक्कम कर्मचाऱ्यास लाभदायक ठरेल ते सेवानिवृत्तीवेतन मिळण्याची मागणी केली होती."सदर प्रकरणी मा.न्यायालयाने याचिकाकर्त्यांची मागणी मान्य करताना दिनांक १३ ऑक्टोबर,२०१४ रोजी पुढील आदेश पारित केले आहेत:-"Respondents to pay the petitioner Nos 2 to 19 difference in enhanced pension payable in terms of Government Decision No SEVANIVE/1009/PRAKRA.33/SEVA-4 dated 30.10.2009 by fixing cut off date as 1/1/2009 along with the interest."

०२. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशांचे पालन करण्यासाठी दिनांक २४ एप्रिल,२०१८ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.त्यानुसार दिनांक १ जानेवारी,२००६ ते दिनांक २६ फेब्रुवारी,२००९ या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या याचिकाकर्त्यांचे (याचिका क्रमांक ८२५६/२०१३) सेवानिवृत्तीवेतन सुधारित करून, सेवानिवृत्तीवेतनाच्या लाभाची रक्कम फरकासह अदा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशांचे तंतोतंत पालन व्हावे याकरिता याचिकाकर्त्यांना रु.४७,९५,१२७/- इतकी व्याजाची रक्कम प्रदान करण्याचा प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण यांनी दिनांक १२ जानेवारी,२०२३ च्या पत्रान्वये सादर केला होता. त्यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

याचिका क्रमांक ८२५६/२०१३ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक १३ ऑक्टोबर,२०१४ रोजी दिलेल्या आदेशानुसार दिनांक १ जानेवारी,२००६ ते दिनांक २६ फेब्रुवारी,२००९ या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या याचिकाकर्त्यांना एकूण रु.४७,९५,१२७/- (सतेचाळीस लाख पंच्याण्णव हजार एकशे सत्तावीस) इतकी व्याजाची रक्कम प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा शासन निर्णय मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्रमांक ८२५६/२०१३ मध्ये दि.१३ ऑक्टोबर,२०१४ रोजी दिलेल्या आदेशानुसार आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक

२६/२३/सेवा-४ दिनांक १४ मार्च,२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२८१८०४५३९२०८ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.04.20 16:23:23 +05'30'

**( अजित बाविस्कर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई.
२. महालेखापल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई-१, महाराष्ट्र (५प्रती).
३. महालेखापल (लेखा परीक्षा), मुंबई-१, महाराष्ट्र (५प्रती).
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, सोलापूर विभाग आणि कोल्हापूर विभाग.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर आणि कोल्हापूर.
७. वित्त विभाग (तेदक-४/व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (विशि-१).